# कर्दळीवन

# ।। नित्यपाठ साधना ।।



कर्दळीवन सेवा संघ पुणे



# कर्दळीवन नित्यपाठ साधना




सेवा संघ, पुणे

मूल्य : ₹ २१/-

कर्दळीवनामध्ये पंच परिक्रमा करीत असताना अक्कमहादेवीच्या गुहेमध्ये अत्यंत शांत, पवित्र आणि दैवी वातावरणामध्ये विविध प्रकारची स्तोत्रे, श्लोक, पदे आणि आरत्या गाऊन साधना आणि उपासना करताना एक अद्भुत अनुभूती येते. त्या सर्वांचे हे संकलन आहे. कर्दळीवना बरोबरच श्रीदत्त परिक्रमा, स्वर्गारोहिणी, उत्तरावाहिनी नर्मदा परिक्रमा करताना ही साधना, उपासना केली जाते. परिक्रमेनंतरही परिक्रमार्थींच्या दैनंदिन दिनचर्येचा ती एक भाग बनून गेली आहे.

# – अनुक्रमणिका –

# ।। ध्यानाचे श्लोक ।।

सदासर्वदा योग तुझा घडावा
तुझे कारणी देह माझा पडावा
उपेक्षू नको गुणवंता अनंता
रघुनायका मागणे हेची आता ।। १।।

।। जय जय रघुवीर समर्थ ।।

समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।
असा सर्व भूमंडळी कोण आहे ।।
जयाची लीला वर्णिती लोक तिन्ही
नुपेक्षु कदा रामदासाभिमानी ।। २ ।।
उपासनेला दृढ चालवावे ।
भूदेव संतासि सदा नमावे ।।

सत्कर्मयोगे वय घालवावे ।
सर्वांमुखी मंगल बोलवावे ।। ३ ।।

गुरूर्ब्रह्मा गुरूर्विष्णु । गुरूर्देवो महेश्वरः ।
गुरूः साक्षात्परब्रह्म । तस्मै श्रीगुरवे नमः ।।

ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं ।
द्वंद्वातीतं गगनसदृशं सद्गुरू त्वम नमामी ।

तिन शिरे सहा हात तया माझा दंडवत
काखे झोळी पुढे श्वान नित्य जान्हवीचे स्नान
माथी शोभे जटाभार अंगी विभूती सुंदर
तुका म्हणे दिगंबर तया माझा नमस्कार

श्रीपाद श्रीवल्लभ नरहरि, दत्तात्रेया दिगंबरा ।
वासुदेवानन्द सरस्वति, सद्गुरूनाथा कृपा करा ।।



काषायवस्त्रं करदंडधारिणं
कमंडलु पद्मकरेण शंखं ।
चक्रं गदाभूषित भूषणाढ्यं
श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ।।१।।

औदुंबरः कल्पवृक्षः कामधेनुश्च संगमः ।
चिंतामणी गुरोः पादौ दुर्लभौ भुवनत्रये ।।२।।

कृतेजनार्दनो देवस्त्रेतायां रघुनंदनः ।
द्वापारे रामकृष्णौ च कलौ श्रीपादवल्लभः ।।३।।

औदुंबरातळवटीं नरसिंह योगी ।
कृष्णातीरी परम शांतिसुखासी भोगी ।
ध्यानस्थ होउनि समस्त चरित्र पाहे ।
अनन्य जो शरण इच्छित देत आहे ।
त्रैमूर्तिराजा गुरु तोचि माझा ।
कृष्णातिरीं वास करोनि वोजा ।

सुभक्त तेथें करिती आनंदा ।
ते सुर स्वर्गी पहाती विनोदा ।।





# नव नाग

अनंत, वासुकी, शेषं, पद्मनाभं च कम्वलं
शंखपालं, धृतराष्ट्रकंच, तक्षकं, कालियं तथा
एतानि नवनामानि नागानाम् च महात्मना
सायंकाले पठेन्नित्यम् प्रातःकाले विशेषतः
तस्य विषभयं नास्ति, सर्वत्र विजयी भवेत् ।



# बारा ज्योतिर्लिंगे



सौराष्ट्रे सोमनाथंच श्रीशैल्ये मल्लिकार्जुनम् ।
उज्ञयिन्याम् महाकालम् ओंकारम् अमलेश्वरम्।
परल्यां वैजनाथं च डाकिन्यां भीमशंकरा ।
सेतुबंधे तु रामेशं, नागेशं दारुकावने ।
वाराणस्यां तु विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे
हिमालये तु केदारम् घृष्णेशंतू शिवालये
एतानि ज्योतिर्लिंगानी सायंप्रातः पठेन्नरः
सप्तजन्मंकृतपापं स्मरणेन विनश्यति ।

# सिद्ध मंगल स्तोत्र



श्री मदनंत श्री विभुषीत अप्पल
लक्ष्मी नरसिंह राजा ।
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

श्री विद्याधरी राधा सुरेखा
श्री राखीधर श्रीपादा
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

माता सुमती वात्सल्यामृत
परिपोषित जय श्रीपादा
**जय विजयी भव**
**दिग्विजयीभव श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

सत्यऋषीश्वरदुहितानंदन
बापनाचार्यानुत श्रीचरणा
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

सावित्रकाठक चयन पुण्यफल
भारद्वाज ऋषी गोत्र संभवा
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

दौ चौपाती देव, लक्ष्मीगण
संख्या बोधित श्रीचरणा
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

पुण्यरुपिणी राजमांबासुत
गर्भपुण्यफलसंजाता
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

सुमतीनंदन नरहरीनंदन
दत्तदेव प्रभु श्रीपादा
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

पीठीकापुर नित्यविहारा
मधुमतीदत्ता मंगलरूपा
**जय विजयी भव दिग्विजयीभव**
**श्रीमदखंड श्रीविजयी भव ।।**

।। श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ।।



# अघोरकष्टोद्धरण स्तोत्रं



श्रीपाद श्रीवल्लभ त्वं सदैव ।।
श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदेव ।।
भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते ।।
घोरात् कष्टात् उद्धरात् स्मान नमस्ते ।।१।।

त्वं नो माता त्वं पिताऽप्तोऽधिपस्त्वं ।।
त्राता योगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वम् ।।
त्वं सर्वस्वं नो प्रभो विश्वमूर्ते ।।
घोरात् कष्टात् उद्धरात् स्मान नमस्ते ।।२।।

पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं ।।
भीतिं क्लेशं त्वं हराऽशुत्वदैन्यम् ।।
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते ।।
घोरात् कष्टात् उद्धरात् स्मान नमस्ते ।।३।।

नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता ।।
त्वत्तो देव त्वं शरण्योऽकर्हता ।।
कुर्वात्रेयानुग्रहं पूर्णराते ।।
घोरात् कष्टात् उद्धरात् स्मान नमस्ते ।।४।।

धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिम् ।।
सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम् ।।
भावासक्तिंचाखिलानन्दमूर्ते ।।
घोरात् कष्टात् उद्धरात् स्मान नमस्ते ।।५।।

श्लोकपंचकमेतद्यो लोकमंगलवर्धनम् ।।
प्रपठेन्नियतो भक्त्या स श्रीदत्तप्रियो भवेत् ।।६।।

।। इति श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी कृत अघोरकष्टोद्धरण स्तोत्र संपूर्णम् ।।



# स्वामी समर्थ तारक मंत्र



निःशंक हो निर्भय हो मना रे ।
प्रचंड स्वामी बळ पाठीशी रे ।
अतर्क्य अवधूत हे स्मरण गामी
अशक्य ही शक्य करतील स्वामी ।।धृ।।

जिथे स्वामी पाय तिथे न्यून काय ।
स्वये भक्त प्रारब्ध घडवेल ही माय ।।
आज्ञेवीणा काळ ना नेई त्याला ।
परलोकी ही ना भीती तयाला ।।१।।

उगाची भीतोसी भय हे पळू दे ।
जवळी उभी स्वामी शक्ती कळू दे ।।

जगी जन्ममृत्यू असे खेळ ज्यांचा ।
नको घाबरू तू असे बाळ त्यांचा ।।२।।

खरा होई जागा तू श्रद्धेसहित ।
कसा होशील त्याविण तू स्वामीभक्त ।।
कितीदा दिला बोल त्यांनीच हात ।
नको डगमगू स्वामी देतील साथ ।।३।।

विभूती नमन नाम ध्यानादी तीर्थ ।
स्वामीच या पंचप्राणामृतात ।।
हे तीर्थ घेई आठवी रे प्रचिती ।
न सोडी कदा जया स्वामी घेती हाती ।।४।।

।। श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ।।

।। श्रीस्वामी समर्थ महाराज की जय।।



# श्री रामरक्षा स्तोत्र



श्री गणेशाय नमः । अस्य श्रीरामरक्षास्तोत्र–मन्त्रस्य । बुधकौशिक ऋषिः । श्रीसीतारामचन्द्रो देवता । अनुष्टुप् छन्दः । सीता शक्तिः । श्रीमद् हनुमान कीलकम् । श्रीरामचन्द्रप्रीत्यर्थे जपे विनियोगः। अथ ध्यानम् । ध्यायेदाजानुबाहुं धृतशरधनुषं बद्धपद्मासनस्थं । पीतं वासो वसानम् नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम । वामाङ्कारूढसीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभं ।

नानालङ्कारदीप्तं दधतमुरुजटामण्डलं रामचन्द्रम् ।। इति ध्यानम् ।। चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् । एकैकमक्षरमं पुसां महापातकनाशनम् ।।१।। ध्यात्वा नीलोत्पलश्यामं रामं राजीवलोचनम् । जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमण्डितम् ।।२।। सासितूणधनुर्बाणपाणिं नक्तंचरांकम् । स्वलीलया जगत्त्रातुमाविर्भूतमजं विभुम् ।।३।। रामरक्षां पठेत् प्राज्ञः प्रापघ्नीं सर्वकामदाम् । शिरो मे राघवः पातु भालं दशरथात्मजः ।।४।। कौसल्येयो दृशौ पातु विश्वामित्रप्रियः श्रुती । घ्राणं पातु मखत्राता मुख सौमित्रिवत्सलः ।।५।। जिह्वां विद्यानिधिः पातु कण्ठं भरतवंदितः । स्कन्धौ दिव्यायुधः पातु भुजौ भग्नेशकार्मुकः ।।६।। करौ सीतापतिः पातु हृदयं जामदग्न्यजित् । मध्यं पातु खरध्वंसी नाभिं जाम्बवदाश्रयः ।।७।। सुग्रीवेशः कटी पातु सक्थिनी हनुमत्प्रभुः । ऊरू रघूत्तमः पातु रक्षः कुलविनाशकृत् ।।८।। जानुनी सेतुकृत्पातु जंघे

दशमुखान्तकः । पादौ बिभीषण श्रीदः पातु रामो खिलं वपुः ।।९।। एतां रामबलोपेतां रक्षां यः सुकृती पठेत् । स चिरायुः सुखी पुत्री विजयी विनयी भवेत् ।।१०।। पातालभूतलव्योम चारिणश्छद्मचारिणः । न द्रष्टुमपि शक्तास्ते रक्षितं रामनामभिः ।।११।। रामेति रामभद्रेति रामचन्द्रेति वा स्मरन् । नरो न लिप्यते पापैर्भुक्तिं मुक्तिं च विन्दति ।।१२।। जगज्जैत्रेकमन्त्रेण रामनाम्नाभिरक्षितम् । यः कन्ठे धारयेत्तस्य करस्थाः सर्वसिद्धयः ।।१३।। वज्रपंजरनामेदमं यो रामकवचं स्मरेत् । अव्याहताज्ञ सर्वत्र लभते जयमङ्गलम् ।।१४।। आदिष्टवान् यथा स्वप्ने रामरक्षामिमा हरः । तथा लिखितवान् प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः ।।१५।। आरामः कल्पवृक्षाणां विरामः सकलापदाम् । अभिरामस्त्रिलोकानां रामः श्रीमान् स नः प्रभुः ।।१६।। तरुणौ रूपसंपन्नौ सुकुमारौ महाबलौ । पुण्डरीक विशालाक्षौ चीरकृष्णाजिनांबरौ ।।१७।। फलमूलाशिनौ

दान्तौ तापसौ ब्रह्मचारिणौ । पुत्रौ दशरथस्यैतौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ।।१८।। शरण्यौ सर्वसत्वानां श्रेष्ठौ सर्वधनुष्मताम् । रक्षः कुलनिहन्तारौ त्रायेतां नो रघुत्तमौ ।।१९।। आत्तसज्ञधनुषाविषुस्पृशावक्षयाशुगनिषङ्गसङ्गिनौ । रक्षणाय मम् रामलक्ष्ममणावग्रतः पथि सदैव गच्छताम् ।।२०।। संनद्धः कवची खड्गी चापबाणधरो युवा गच्छन मनोरथोस्माकं रामः पातु सलक्ष्मणः ।।२१।। रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली । काकुत्स्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः ।।२२। वेदान्तवेद्यो यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः । जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः ।।२३।। इत्येतानि जपोन्नित्यं मदभक्तः श्रद्धयान्वितः । अश्वमेधाधिकं पुण्य संप्राप्नोती न संशयः ।।२४।। रामंदूर्वादलश्यामं पद्माक्षं पीतवाससम् ।। स्तुवन्ति नामभिर्दिव्यैर्न ते संसारिणो नरः ।।२५।। रामं लक्ष्मणपूर्वजं रघुवरं सीतापतिं सुन्दरं । काकुत्स्थं करुणार्णवं गुणनिधिं विप्रप्रियं धार्मिकम् ।।२६।। राजेन्द्रं

सत्यसन्धं दशरथतनयं श्यामलं शान्तमूर्तिम् । वन्दे लोकाभिरामं रघुकुलतिलकम् राघवं रावणारिम् ।।२७।। रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ।।२८।। श्रीराम राम रघुनन्दन राम राम श्रीराम राम भरताग्रज राम राम ।। श्रीराम राम रणकर्कश राम राम, श्रीराम राम शरणं भव राम राम ।।२९।। श्रीरामचन्द्रचरणौ मनसा स्मरामि, श्रीरामचन्द्रचरणौ वचसा गृणामि ।। श्रीरामचन्द्रचरणौ शिरसा नमामि, श्रीरामचन्द्रचरणौ शरणं प्रपद्ये ।।३०।। माता रामो मत्पिता रामचन्द्रः स्वामी रामो मत्सखा रामचन्द्रः ।। सर्वस्वं मे रामचन्द्रो दयालुः नान्यं जाने नैव जाने न जाने ।।३१।। दक्षिणे लक्ष्मणो यस्य वामे तु जनकात्मजा । पुरतो मारुतिर्यस्य तं वन्दे रघुनन्दनम् ।।३२।। लोकाभिरामं रणरंगधीरं राजीवनेत्रं रघुवंशनाथम् । कारुण्यरूपं करुणाकरं तं श्रीरामचन्द्रं शरणं प्रपद्ये ।।३३।। मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां

वरिष्ठम् । वातात्मजं वानरूथयमुख्यं श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ।।३४।। कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम् । आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम् ।।३५।। आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् । लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ।।३६।। भर्जनं भवबीजानामर्जनं सुखसंपदाम् । तर्जन यमदूतानां रामरामेति गर्जनम् ।।३७।। रामो राजमणिः सदा विजयते रामं रमेशं भजे । रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नमः ।।३८।। रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोस्म्यहम् । रामे चित्तलयः सदा भवतु मे भो राम मामुद्धर ।।३९।। रामरामेति रामेति रमे रामे मनोरमे । सहस्रनाम तत्तुल्यं रामनाम वरानने ।।४०।। इति श्री बुधकौशिकविरचितं श्रीरामरक्षास्तोत्रं सम्पूर्णम्।

।। श्री सितारामचंद्रास् प्रणमस्तु ।।



# श्री मारुती स्तोत्र



भीमरूपी महारुद्रा, वज्र हनुमान मारुती ।
वनारी अंजनीसूता, रामदूता प्रभंजना ।।१।।

महाबळी प्राणदाता, सकळा उठवी बळे ।
सौख्यकारी दुःखहारी दूत वैष्णव गायका ।।२।।

दीनानाथा हरिरूपा, सुंदरा जगदंतरा ।
पातालदेवताहंता, भव्यसिंदूर लेपना ।।३।।

लोकनाथा जगन्नाथा, प्राणनाथा पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीला पावना परितोषका ।।४।।

ध्वजांग्रे उचली बाहो, आवेशें लोटला पुढें ।
काळाग्नि काळरुद्राग्नी, देखतां कांपती भयें ।।५।।
ब्रह्मांडे माइलीं नेणों, आवळे दंतपंगती ।
नेत्राग्नी चालिल्या ज्वाला, भृकुटी ताठिल्याबळे ।।६।।
पुच्छ तें मुरडीलें माथां किरीटी कुंडलें बरीं ।
सुवर्णकटिकांसोटी, घंटा किंकिणि नागरा ।।७।।
ठकारें पर्वताऐसा, नेटका सडपातळू ।
चपळांग पाहतां मोठें, महाविद्युल्लतेपरी ।।८।।
कोटिच्या कोटि उड्डाणें, झेपावें उत्तरेकडे ।
मंदाद्रीसारखा द्रोणू, क्रोधे उत्पाटिला बळे ।।९।।
आणिला मागुती नेला, आला गेला मनोगती ।
मनासी टाकिलें मागें गतीसी तुळणा नसे ।।१०।।
अणूपासोनि ब्रह्मांडा एवढा होत जातसे ।
तयासी तुळणा कोठे मेरुमंदार धाकुटे ।।११।।
ब्रह्मांडाभोवतें वेढे, वज्रपुच्छें करूं शके ।
तयासी तुळणा कैंची, ब्रह्मांडीं पाहतां नसे ।।१२।।

आरक्त देखिलें डोळां, ग्रासिले सूर्यमंडला ।
वाढतां वाढता वाढें, भेदिलें शून्यमंडला ।।१३।।

धनधान्यपशुवृद्धि, पुत्रपौत्र समस्तही ।
पावती रुपविद्यादि, स्तोत्रपाठेंकरूनियां ।।१४।।

भूतप्रेतसमंधादि, रोगव्याधि समस्तही ।
नासतीतुटती चिंता, आनंदे भीमदर्शनें ।।१५।।

हे धरा पंधराश्लोकी, लाभली शोभली बरी ।
दृढदेहो निसंदेहो, संख्या चंद्रकलागुणें ।।१६।।

रामदासीं अग्रगणू, कपिकुळासी मंडणू ।
रामरूपी अंतरात्मा, दर्शनें दोष नासती ।।१७।।

इति श्री रामदासकृत संकट निरसनम्
श्री मारुतीस्तोत्रं संपूर्णम् ।।



# ।। शिवस्तुति ।।



श्रीगणेशाय नमः कैलासराणा शिव चंद्रमौळी । फणींद्रमाथां मुकुटी झळाळी । कारुण्यसिंधू भवदुःखहारी। तुजवीण शंभो मज कोण तारी ।।१।। रवींदु दावानल पूर्ण भाळी । स्वतेज नेत्रीं तिमिरौध जाळी । ब्रह्मांडधीशा मदनांतकारी तुज. ।।२।। जटा विभूती उटि चंदनाची । कपालमाला प्रित गौतमीची ।। पंचानना विश्वनिवांतकारी तुज. ।।३।। वैराग्ययोगी शिवशूळपाणी । सदा समाधी निजबोधवाणी । उमानिवासा त्रिपुरांतकारी ।। तुज.

।।४।। उदार मेरु पती शैलजेचा । श्रीविश्वनाथ म्हणती सुरांचा ।। दयानिधी जो गजचर्मधारी ।। तुज. ।।५।। ब्रह्मादि वंदी अमरादिनाथ । भुजंगमाला धरी सोमकांत ।। गंगा शिरी दोष महा विदारी ।। तुज. ।।६।। कर्पुरगौरी गिरिजा विराजे । हळाहळे कंठ निळाचि साजे । दारिद्र्यदुःखे स्मरणे निवारी ।। तुज. ।।७।। स्मशानक्रीडा करितां सुखावे । तो देवचूडामणि कोण आहे । उदासमूर्ती जटाभस्मधारी ।। तुज. ।।८।। भूतादिनाथ अरि अंतकाचा । तो स्वामि माझा ध्वज शांभवाचा ।। राजा महेश बहुबाहुधरी ।। तुज. ।।९।। नंदी हराचा हर नंदिकेश । श्री विश्वनाथ म्हणती सुरेश ।। सदाशिव व्यापक तापहारी ।। तुज. ।।१०।। भयानक भीम विक्राळ नग्न । लीलाविनोदे करि काम भग्न ।। तो रुद्र विश्वंभर दक्ष मारी । तुज. ।।११।। इच्छा हराची जग हे विशाळ । पाळी रुची तो करि ब्रह्मगोळ ।। उमापती भैरव विघ्नहारी । तुज. ।।१२।। भागिरथीतीर सदा पवित्र । जेथे असे तारक ब्रह्ममंत्र ।। विश्वेश विश्वंभर त्रिनेत्रधारी । तुज. ।।१३।।

प्रयाग वेणी सकळा हराच्या । पदारविंदी वहाती हरीच्या ।। मंदाकिनी मंगल मोक्षकारी । तुज. ।।१४।। कीर्ती हराची स्तुति बोलवेना । कैवल्यदाता मनुजां कळेना ।। एकाग्रनाथ विष अंगिकारी ।। तुज. ।।१५।। सर्वांतरी व्यापक जो नियंता । तो प्राणलिंगाजवळी महंता ।। अंकी उमा ते गिरिरुपधारी । तुज. ।।१६।। सदा तपस्वी असे कामधेनू । सदा सतेज शशि कोटिभानू ।। गौरीपती जो सदा भस्मधारी । तुज. ।।१७।। कर्पूरगौरी स्मरल्या विसांवा । चिंता हरी जो भजकां सदैवा ।। अंती स्वहीत सूचना विचारी । तुज. ।।१८।। विरामकाळी विकळ शरीर । उदास चित्ती न धरीच धीर । चिंतामणी चिंतने चित्तहारी । तुज. ।।१९।। सुखावसाने सकळे सुखाचीं । दुःखावसाने टळती जगाची ।। देहावसाने धरणी थरारी । तुज. ।।२०।। अनुहातशब्द गगनी न माय । त्याचेनि नादे भव शून्य होय ।। कथा निजांगे करुणा कुमारी । तुज. ।।२१।। शांती स्वलीला वदनी विलासे । ब्रह्मांडगोळी असुनी न दीसे ।। भिल्ली भवानी शिव

ब्रह्मचारी । तुज. ।।२२।। पीतांबरे मंडित नाभि ज्याची। शोभा जडीत वरि किंकिणीची ।। श्रीदेवदत्त दुरीतांतकारी। तुज. ।।२३।। जिवाशिवांची जडली समाधी । विटला प्रपंच तुटली उपाधी ।। शुद्धस्वरे गर्जति वेद चारी । तुज. ।।२४।। निधानकुंभ भरला अभंग । पहा निजांगे शिव ज्योतिर्लिंग ।। गंभीर धीर सुर चक्रधारी । तुज. ।।२५।। मंदार बिल्व बकुले सुवासी । माला पवित्र वहा शंकरासी ।। काशीपुरी भैरव विश्व तारी । तुज. ।।२६।। जाईजुई चंपक पुष्पजाती । शोभे गळा मालतिमाळ हाती ।। प्रतापसूर्य शरचापधारी तुज. ।।२७।। अलक्ष्यमुद्रा श्रवणी प्रकाशे । संपूर्ण शोभा वदनी विकासे ।। नेई सुपंथे भवपैलतीरी । तुज. ।।२८।। नागेशनामा सकळा जिव्हाळा । मना जपे रे शिवमंत्रमाळा ।। पंचाक्षरी ध्यान गुहाविहारी । तुज. ।।२९।। एकांती ये रे गुरुराज स्वामी । चैतन्यरुपी शिव सूखनामी ।। शिणलो दयाळा बहुसाल भारी ।। तुज. ।।३०।। शास्त्राभ्यास नको श्रुती पढूं नको । तीर्थासी जाऊ नको ।

योगाभ्यास नको व्रते मख नको। तीव्रे तपे ती नको ।। काळाचे भय मनासी धरुं नको । दुष्टासि शंकू नको । ज्याचीया स्मरणे पतीत तरती । तो शंभु सोडू नको ।।३१।। प्रांतकाले शिवंदृष्ट्या निशी पापं विनश्यती । आजन्म कृतमाध्याने सायांने सप्तजन्मनी। मेरू कांचन दत्तानाम् गवांकोटी शतैरपी । पंचकोटी तुरुंगानामे तद्फलम् शिवदर्शनम् ।।

।। श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ।।

।। शुभं भवतु ।।



# ।। श्री गुरुचरित्र सार ।।

**जगत्वंद्य अवधूत दिगंबर,**
**दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।**
**अनन्यभावे शरणागत मी,**
**भवभय वारण तुम्हीच ना ।।धृ.।।**

कार्तवीर्य, यदू, परशुरामही, प्रबोधिले गुरु तुम्हीच ना ।
स्वामी जनार्दन एकनाथही, कृतार्थ केले तुम्हीच ना ।
नवनारायण सनाथ करुनी, धर्म कथियला तुम्हीच ना ।
मत्स्येंद्रादि यति प्रवृत्त करुनी, जन उद्धरिले तुम्हीच ना ।
दासोपंता घरी रंगले, परमानंदे तुम्हीच ना ।
नाथ सदनीचे चोपदारही, श्री गुरुदत्ता तुम्हीच ना ।
युगायुगी निजभक्त रक्षणा, अवतरता गुरु तुम्हीच ना ।
बालोन्मत पिशाच्चवृत्ती, धारण करता तुम्हीच ना ।

**जगत्‌वंद्य अवधूत दिगंबर, दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।**
**अनन्यभावे शरणागत मी, भवभय वारण तुम्हीच ना ।।१।।**

स्नान काशिपुरी चंदन पंढरी, संध्या सागरी तुम्हीच ना ।
करुनी भिक्षा करविरी भोजन, पांचाळेश्वरी तुम्हीच ना ।

तुळजापुरी करशुद्ध तांबुल, निद्रा माहुरी तुम्हीच ना ।
करुनी समाधी मग्न निरंतर, गिरीनारी गुरु तुम्हीच ना ।

विप्रस्त्रियेच्या वचनी गुंतले, पिठापुरी गुरु तुम्हीच ना ।
श्रीपाद श्रीवल्लभ नरसिंहसरस्वती, करंज नगरी तुम्हीच ना

जन्मजात ओंकार जपोनी, मौन धरियले तुम्हीच ना ।
मौजीबंधनी वेद वदोनी, जननी सुखविली तुम्हीच ना ।

**जगत्‌वंद्य अवधूत दिगंबर, दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।**
**अनन्यभावे शरणागत मी, भवभय वारण तुम्हीच ना ।।२।।**

चातुर्थाश्रम जीर्णोद्धार, आश्रम घेऊनी तुम्हीच ना ।
कृष्ण सरस्वती सद्‌गुरु वंदुनी, तीर्था जमले तुम्हीच ना ।

माधवारण्य कृतार्थ केला,आश्रम देऊनी तुम्हीच ना ।
पोटशुळाची व्यथा हरोनी, विप्र सुखविला तुम्हीच ना ।
वेल उपटुनी विप्रा दिधला, हेमकुंभ गुरु तुम्हीच ना ।
तस्कर वधुनी विप्र रक्षिला, भक्त वत्सला तुम्हीच ना ।
विप्र स्त्रियेचा पुत्र उठविला, निष्ठा देखुनी तुम्हीच ना ।
हीन जीव वेदपाणि केला, सजिव करुनी तुम्हीच ना ।
**जगत्वंद्य अवधूत दिगंबर, दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।**
**अनन्यभावे शरणागत मी, भवभय वारण तुम्हीच ना ।। ३।।**
वाडी नृसिंह, औदुंबरही, वास्तव्य करुनी तुम्हीच ना ।
भिमा अमरजा-संगमी आले, गाणगापुरी तुम्हीच ना ।
ब्राह्म मुहुर्ती संगम स्थानी, अनुष्ठानी रत तुम्हीच ना ।
करुनी भिक्षा ग्रामी राहता, मध्यान्ही मठी तुम्हीच ना ।
ब्रह्म राक्षसा मोक्ष देऊनी, उद्धरिले गुरु तुम्हीच ना ।
वांझ महीषी दुभविले, फुलविले शुष्क काष्ठ गुरु तुम्हीच ना ।

नंदी नामा कूष्ठी केला, दिव्य देही गुरु तुम्हीच ना ।
त्रिविक्रमा विश्वरुप दाविले, कुमसी ग्रामी तुम्हीच ना ।
**जगत्वंद्य अवधूत दिगंबर, दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।**
**अनन्यभावे शरणागत मी, भवभय वारण तुम्हीच ना ।।४।।**

अगणित दिधले धान्य कापुनी, शुद्र शेती गुरु तुम्हीच ना ।
रत्नाईचे कुष्ठ दवडिले, तीर्थे वर्णित तुम्हीच ना ।
आठही ग्रामी भिक्षा केली, दीपावली दिनी तुम्हीच ना ।
भास्कर हस्ते चार सहस्त्रा, भोजन दिधले तुम्हीच ना ।
निमिषमात्रे तंतुक नेला, श्री शैल्याशी तुम्हीच ना ।
सायंदेवा काशी यात्रा, दाखविली गुरु तुम्हीच ना ।
चांडाळामुखी वेद वदविले, गर्व हराया तुम्हीच ना ।
साठ वर्षे वांझेसी दिधले, कन्या पुत्रही तुम्हीच ना ।
**जगत्वंद्य अवधूत दिगंबर, दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।**
**अनन्यभावे शरणागत मी, भवभय वारण तुम्हीच ना ।।५।।**

कृतार्थ केला मानस पूजनी, नरकेसरी गुरु तुम्हीच ना ।
माहुरचा सतिपती उठवून, धर्म कथियला तुम्हीच ना ।
रजकाचा यवनराज बनवुनी,उद्धरिला गुरु तुम्हीच ना ।
अनन्य भावे भजता सेवक, तरतील वदले तुम्हीच ना ।
कर्दळी वनिचा बहाणा करुनी, गाणगापुरी गुरु तुम्हीच ना ।
निर्गुण पादुका दृष्य ठेवूनी, गुप्त स्वामी मठी तुम्हीच ना ।
विठामाउचा दास मूढ परी, अंगिकारीला तुम्हीच ना ।
आत्मचिंतनी मला निशिदीनी, दीनानाथ गुरु तुम्हीच ना ।। ६ ।।
जगत्वंद्य अवधूत दिगंबर, दत्तात्रय गुरु तुम्हीच ना ।
अनन्यभावे शरणागत मी, भवभय वारण तुम्हीच नाऽऽऽ ।।

।। अवधुत चिंतन श्री गुरुदेव दत्त ।।

।। श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ।।



# ।। श्रीदत्त शरणाष्टक ।।

दत्तात्रेया तव शरणं । दत्तनाथा तव शरणं । त्रिगुणात्मका त्रिगुणातीता । त्रिभुवनपालक तव शरणं ।।१।। शाश्वतमूर्ते तव शरणं । श्यामसुंदरा तव शरणं। शेषाभरणा शेषभूषणा । शेषशायी गुरु तव शरणं ।।२।। षड्भुजमूर्ते तव शरणं । षड्भुज यतिवर तव शरणं । दंडकमंडलुगदापद्म । शंखचक्रधर तव शरणं ।।३।। करुणानिधे तव शरणं । करुणासागरा तव शरणं । श्रीपाद श्रीवल्लभ गुरुवर । नृसिंहसरस्वती तव शरणं ।।४।। श्रीगुरुनाथ तव शरणं । सद्गुरुनाथा तव शरणं । कृष्णासंगमीं तरुतळवासी । भक्तवत्सला तव शरणं ।।५।। कृपामूर्ते तव शरणं । कृपासागरा तव शरणं । कृपाकटाक्षा कृपावलोकन । कृपानिधे प्रभु तव शरणं ।।६।। कालांतका तव शरणं । कालनाशका तव शरणं । पूर्णानंदा पूर्णपरेश ।

पुराणपुरुषा तव शरणं ।।७।। जगदीशा तव शरणं । जगन्नाथा तव शरणं । जगत्पालका जगदाधीशा । जगदोद्धारा तव शरणं ।।८।। अखिलांतरा तव शरणं। अखिलैश्वर्या तव शरणं । भक्तप्रिया वज्रपंजरा । प्रसन्नवक्त्रा तव शरणं ।।९।। दिगंबरा तव शरणं । दीनदयाघन तव शरणं । दीनानाथा दीनदयाळा । दीनोद्धारा तव शरणं ।।१०।। तपोमूर्ते तव शरणं । तेजोराशी तव शरणं । ब्रह्मानंदा ब्रह्म सनातन । ब्रह्ममोहना तव शरणं ।।११।। विश्वात्मका तव शरणं। विश्वरक्षका तव शरणं । विश्वंभरा विश्वजीवना । विश्वपरात्पर तव शरणं ।।१२।। विघ्नांतका तव शरणं। विघ्ननाशका तव शरणं । प्रणवातीता प्रेमवर्धना । प्रकाशमूर्ते तव शरणं ।।१३।। निजानंदा तव शरणं । निजपददायक तव शरणं । नित्यनिरंजन निराकारा । निराधारा तव शरणं ।।१४।। चिद्घनमूर्ते तव शरणं। चिदाकारा तव शरणं । चिदात्मरुपा चिदानंदा ।

चित्सुखकंदा तव शरणं ।।१५।। अनादिमूर्ते तव शरणं। अखिलावतारा तव शरणं । अनंतकोटिब्रह्मांडनायका। अघटितघटना तव शरणं ।।१६।। भक्तोद्धारा तव शरणं । भक्तरक्षका तव शरणं । भक्तानुग्रह गुरुभक्तप्रिय। पतितोद्धारा तव शरणं ।।१७।।





# करुणात्रिपदी पद - १

शांत हो श्रीगुरुदत्ता,
मम चित्ता शमवी आतां ।।ध्रु.।।
तू केवळ माता जनिता,
सर्वथा तूं हितकर्ता ।।
तू आप्त स्वजन भ्राता, सर्वथा तूंचि त्राता ।।

(चाल) भयकर्ता तू भयहर्ता ।।
दंडधर्ता तू परिपाता ।।
तुजवांचुनि न दुजी वार्ता ।
तूं आर्ता आश्रय दत्ता ।
शांत हो श्रीगुरुदत्ता ।।१।।

अपराधास्तव गुरुनाथा,
जरि दंडा धरिसी यथार्था ।।
तरि आम्हीं गाउनि गाथा,
तव चरणी नमवूं माथा ।।

(चाल) तूं तथापि दंडिसि देवा ।
कोणाचा मग करूं धावा ।।
सोडविता दुसरा तेव्हां ।
कोण दत्ता आम्हां त्राता ।।
शांत हो ।।२।।

तूं नटसा होउनि कोपी,
दंडिता ही आम्ही पापी ।।
पुनरपिही चुकत तथापि,
आम्हांवरि न च संतापी ।।
(चाल) गच्छतः स्खलनं क्वापि ।।
असे मानुनि नच हो कोपी ।।
निजकृपालेशा ओपी ।
आम्हांवरि तूं भगवंता ।।
शांत हो ।।३।।

तव पदरीं असता ताता,
आडमार्गी पाऊल पडतां ।।
सांभाळुनी मार्गावरता,
आणिता न दुजा त्राता ।।

(चाल) निज बिरुदा आणुनि चित्ता ।
तूं पतीतपावन दत्ता ।।
वळे आतां आम्हांवरता ।
करुणाघन तूं गुरुनाथा ।।
शांत हो ।।४।।

सहकुटुंब सहपरिवार,
दास आम्हीं हे घरदार ।।
तव पदीं अर्पु असार,
संसाराहित हा भार ।।

(चाल) परिहरिसी करुणासिंधो ।।
तू दीनानाथ सुबंधो ।।

आम्हां अघलेश न बाधो ।
वासुदेव प्रार्थित दत्ता ।।५।।

शांत हो श्रीगुरुदत्ता ।
मम चित्ता शमवी आतां ।।धृ.।।

# करुणात्रिपदी पद - 2

श्रीगुरुदत्ता जय भगवंता ।
तें मन निष्ठुर न करी आतां ।।ध्रु.।।

चोरें द्विजासी मारितां मन जें,
कळवळले तें कळवळो आतां ।।१।।

पोटशुळानें द्विज तडफडतां,
कळवळले तें कळवळो आतां ।।२।।

द्विजसुत मरतां वळले तें मन,
हो कीं उदासीन न वळे आतां ।।३।।

सतिपति मरतां काकुळति येतां,
वळले तें मन न वळे कीं आतां ।।४।।

श्रीगुरुदत्ता त्यजि निष्ठुरता,
कोमलचित्ता वळवी आतां ।।५।। श्रीगुरु. ।।ध्रु.।।

# करुणात्रिपदी पद - 3

जय करुणाघन निजजनजीवन,
अनसूयानंदन पाहि जनार्दन ।।ध्रु.।।

निज अपराधें उपराठी दृष्टी,
होउनि पोटीं भय धरूं पावन ।।१।।

तूं करुणाकर कधीं आम्हांवर,
रुससी न किंकरवरद कृपाघन ।।२।।

वारी अपराध तूं मायबाप,
तव मनीं कोपलेश न वामन ।।३।।

बालकाऽपराधा गणे जरि माता,
तरी कोण त्राता देईल जीवन ।।४।।

प्रार्थी वासुदेव पदीं ठेवी भाव,
पदीं ठेवो ठाव देव अत्रिनंदन ।।५।।



# पद

सांगावे, कवणा ठाया जावे, कवणाते स्मरावे ।
कैसें काय करावे, कवण्यापरि मी रहावे ।
कवण येऊनि कुरुंदवाडी स्वामीतें मिळवावे ।।ध्रु.।।

या हारी जेवावे व्यवहारीं बोलावे संसारी ।
घालुनि अंगिकारी, प्रतिपाळिशी जो निर्धारी ।
केला जो निजनिश्चय,
स्वामी कोठे तो अवधारी ।।२।।

या रानीं माझी करुणावाणी, काया कष्टील प्राणी ।
ऐकुनि घेशिल कानीं । देशिल सौख्यनिधानीं ।
संकटी होऊनि मूर्च्छित असतां,
पाजिल कवण पाणी ।।३।।

त्या वेळा सत्पुरुषांचा मेळा, पाहतसे निज डोळां ।
लाविसि भस्म कपाळा । सांडी भय तूं बाळा ।
श्रीपाद श्रीवल्लभ म्हणती, अभय तुज गोपाळा ।।४।।

सांगावे, कवणा ठाया जावे, कवणातें स्मरावे ।
कैसें काय करावे, कवण्यापरि मी रहावें ।
कवण येऊनि कुरुंदवाडी स्वामीतें मिळवावे ।।ध्रु.।।



।। श्री गणनाथ ।।

# करि-करुणा

मंगलमूर्ते करि करुणा । मंगलनामा करि करुणा ।
मंगलदाता मंगलकर्ता । मंगलरूपा करि करुणा ।।ध्रु.।।

परमानंदा करि करुणा । परमसमर्था करि करुणा ।
परमैश्वर्या परमसुंदरा । परमपवित्रा करि करुणा ।।१।।

मोरेश्वर प्रभु करि करुणा । मयुरनाथ प्रभु करि करुणा ।
मयुरनिवासी मयुरसुंदरा । मयुरारूढा करि करुणा ।।२।।

करुणासागर करि करुणा । करुणामूर्ते करि करुणा ।
करुणाकारित करुणानाथा । करुणादृष्टि करि करुणा ।।३।।

कृपासागरा करि करुणा । परमकृपालो करि करुणा ।
परमोदारा निजभक्तावरि । कृपावर्षका करि करुणा ।।४।।

श्रुतिनिःश्वासा करि करुणा । श्रुतिप्रतिपाद्या करि करुणा ।
श्रुत्यवगम्या श्रुत्यवगाह्या । श्रुतिप्रकाशा करि करुणा ।।५।।

प्रणवाकारा करि करुणा । प्रणववाचका करि करुणा ।
प्रणव जापका मुक्तिदाता । प्रणवानंदा करि करुणा ।।६।।

तुरियज्ञाता करि करुणा । तुर्यातीता करि करुणा ।
तुर्यावस्था प्रकाशका प्रभु । तुर्यानंदा करि करुणा ।।७।।

स्वात्मारामा करि करुणा । आत्मानंदा करि करुणा ।
परमात्मा प्रभु अंतर्यामी । ऐक्यबोधका करि करुणा ।।८।।

निर्गुण परि तू करि करुणा । निष्क्रिय परि तू करि करुणा ।
सर्वसाक्षी तू सर्वात्मा प्रभु । सर्वकारका करि करुणा ।।९।।

भक्तोद्धारा करि करुणा । भक्तवत्सला करि करुणा ।
भक्तपालका भक्ताधीना । भक्तकृपाकर करि करुणा ।।१०।।

विघ्ननायका करि करुणा । विघ्नवारका करि करुणा ।
विघ्नविघातक विघ्नेश्वरप्रभु । कुरु निर्विघ्ना करि करुणा ।।११।।

अनंतशक्ते करि करुणा । अनंत गुणगण करि करुणा ।
अनंतनामा अनंतरूपा । अनंतभक्ता करि करुणा ।।१२।।

विश्वव्यापका करि करुणा । विश्वोद्धारा करि करुणा ।
विश्वोत्पादक विश्वंभरप्रभु । विश्वनियंता करि करुणा ।।१३।।

सर्वेश्वर तू करि करुणा । सर्वव्यापका करि करुणा ।
सर्वप्रकाशक सर्वाधारा । सर्वोद्धारा करि करुणा ।।१४।।

प्रसन्नभक्त्या करि करुणा । प्रसन्नवदना करि करुणा ।
प्रसन्नगात्रा प्रसन्ननेत्रा । प्रसन्नचित्ता करि करुणा ।।१५।।

कृतार्थदर्शन करि करुणा । कृतार्थपूजन करि करुणा ।
कृतार्थसाधन कृतार्थजीवन । कृतार्थ करि मज करि करुणा ।।१६।।

अखंडबोधे करि करुणा । नित्यशुद्धप्रभु करि करुणा ।
निजभक्ता मज ज्ञान देउनी । स्वरुपी स्थापी करि करुणा ।।१७।।

चित्तचालका करि करुणा ।चित्तपालका करि करुणा ।
शोधुनि बोधुनि चित्तचकोरा । ममात्मचंद्रा करि करुणा ।।१८।।

आत्यंतिक तू करि करुणा । पात्र नसे परि करि करुणा ।
शरण पातलो निजभक्तावरी । तुज साजेशी करि करुणा ।।१९।।

श्री गणनाथा करि करुणा । गजानना श्री करि करुणा ।
यति नारायण पदी लागला । बहुत भागला करि करुणा ।।२०।।

नित्य गाई प्रभु करि करुणा । तत्वचिंतनी करि करुणा ।
पापतापभयविघ्ननिवारक । प्रभुराजा भो करि करुणा ।।२१।।

मंगलमूर्ते करि करुणा । मंगलनामा करि करुणा ।
मंगलदाता मंगलकर्ता । मंगलरुपा करि करुणा ।।धृ.।।

इति श्री परमहंस परिव्राजकाचार्य
यति नारायणानंद
सरस्वती कृत ''करि करुणा''
स्तोत्र संपूर्णम्



# पद

दत्ता मजला प्रसन्न होसी जरि तूं वर देसी ।।
तरि मी आन न मागें तुजसी
निर्धारुनि मानसीं ।।ध्रु.।।

स्मरण तुझे मज नित्य असावे ।।
तव गुण भावें गावे ।।
अनासक्तिनें मी वागावे ।। ऐसे मन वळवावे ।।१।।

सर्व इंद्रियें आणि मन हे तुझे हाती आहे ।।
यास्तव आतां तू लवलाहें ।।
स्वपदीं मन रमवावे ।।२।।

विवेक आणि सत्संगति हे नेत्रद्वय बा आहे ।।
वासुदेवा निर्मलदेहे जेणें त्वत्पदिं राहे ।।३।।
दत्ता मजला प्रसन्न होसी ।।



# ती विद्या मिळवूं इथें...

दाविते ज्ञान भानूतें अज्ञान तम नाशिते ।
सुख शाश्वत जी देते ती विद्या मिळवू इथें ।।१।।
दैन्य दुःख लया नेते पाप ताप निवारिते ।
चित्तास शांतता देते ती विद्या मिळवू इथें ।।२।।
मुक्तीस हेतू जी होते अनेकी ऐक्य पाहते ।
अन्तः प्रसन्नता देते ती विद्या मिळवू इथें ।।३।।
लोपवी जी अहंतेते विश्वाचें हित साधिते ।
अनाथा हात जी देते ती विद्या मिळवू इथें ।।४।।
धर्मादि पुरुषार्थातें येते सार्थकता जिथें ।
सार्थ साक्षरता भेटे ती विद्या मिळवू इथें ।।५।।
आनंदीं जन्म जी घेते आनंदे विश्व कोंदते ।
आनंदी लीन जी होते ती विद्या मिळवू इथें ।।६।।



# संतमहिमा

सदा संतांपाशी जावें ।। त्यांचे जवळी बैसावे ।।१।।
उपदेश ते न देती ।। तरी ऐकाव्या त्या गोष्टी ।।२।।
तेचि उपदेश होती ।। त्याही कष्ट नष्ट होती ।।३।।
वासुदेव म्हणे संत ।। संगे करिती पसंत ।।४।।



# अभंग

हेंचि दान देगा देवा ।। तुझा विसर न व्हावा ।।१।।
गुण गाईन आवडी ।। हेचि माझी सर्व जोडी ।।२।।
न लगे मुक्ति धनसंपदा ।। संतसंग देई सदा ।।३।।
तुका म्हणे गर्भवासी ।। सुखें घालावे आम्हासी ।।४।।



# विश्वप्रार्थना

''हे ईश्वरा...
सर्वांना चांगली बुद्धी दे, आरोग्य दे,
सर्वांना सुखात, आनंदात, ऐश्वर्यात ठेव,
सर्वांच भलं कर, कल्याण कर, रक्षण कर,
आणि तुझे गोड नाम मुखात अखंड राहू दे''

# श्लोक

ज्या ज्या स्थळीं हें मन जाय माझे ।
त्या त्या स्थळीं हे निजरूप तुझे ।।१।।
मी ठेवितो मस्तक ज्या ठिकाणी ।
तेथें तुझे सद्गुरु पाय दोन्ही ।।२।।



# आरती गणपतीची

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची ।
नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।।
सर्वांगी सुंदर उटी शेंदुराची ।।
कंठी झळके माळ मुक्ताफळांची ।।१।।
जय देव जय देव जय मंगलमूर्ती ।।
दर्शनमात्रें मन कामना पुरती ।।धृ.।।
रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा ।।
चंदनाची उटी कुंकुमकेशरा ।।
हिरेजडित मुकुट शोभतो फरा ।।
रुणझुणती नुपूरें चरणीं घागरिया ।। जय.।।२।।
लंबोदर पीतांबर फणिवरबंधना ।।
सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना ।।
दास रामाचा वाट पाहे सदना ।।

संकटी पावावें निर्वाणीं रक्षावे सुरवर वंदना ।।

**जय देव जय देव जय मंगलमूर्ती ।। दर्शन मात्रे. ।।३।।**



# ।। श्री शंकराची आरती ।।

लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा ।
विषे कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा ।।
लावण्यसुंदर मस्तकीं बाळा ।
तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझूळां ।।१।।
जय देव जय देव जय श्रीशंकरा ।
आरती ओवाळूं तुज कर्पूरगौरा ।। धृ.।।
कर्पूरगौरा भोळा नयनीं विशाळा ।
अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा ।।
विभूतीचें उधळण शितिकंठ नीठा ।
ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा ।। जय. ।।२।।
देवी दैत्यीं सागरमंथन पैं केले ।

त्यामाजीं अवचीत हळाहळ उठिलें ।
तें त्वां असुरपणे प्राशन केलें ।।
नीलकंठ नाम प्रसिद्ध झाले ।। जय.।।३।।
व्याघ्रांबर फणिवरधर सुदर मदनारी ।।
पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी ।
शतकोटीचें बीज वाचे उच्चारी ।
रघुकुळटिळक रामदासा अंतरी ।। जय.।।४।।



# आरती देवीची

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारी ।।
अनाथनाथे अंबे करुणाविस्तारी ।।
वारी वारी जन्म मरणातें वारी ।
हारी पडलो आता संकट निवारी ।।१।।

जय देवी जय देवी महिषासुरमथिनी ।
सुरवर ईश्वरवरदे तारक संजिवनी ।।धृ।।
त्रिभुवनभुवनी पाहता तुज ऐसी नाही ।
चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं ।।
साही विवाद करिता पडलो प्रवाहीं ।।
ते तूं भक्तांलागी पावसि नवलाहीं ।।जय.।।
प्रसन्न वदने प्रसन्न होसी निजदासा ।।
क्लेशापासुनि सोडी तोडी भवपाशा ।।
अंबे तुजवांचून कोण पुरविल आशा ।।
नरहरि तल्लीन झाला पदपंकजलेशा ।।जय.।।३।।



# दत्ताची आरती

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा ।।
त्रिगुणि अवतार त्रैलोक्य राणा ।।
नेती नेती शब्द नये अनुमाना ।
सुरवर मुनिजन योगी समाधि न ये ध्याना ।।१।।
जय देव जय देव जय श्रीगुरुदत्ता। आरती
ओवाळीता हरली भवचिंता ।। धृ. ।।

सबाह्य अभ्यंतरी तू एक दत्त ।
अभाग्यासी कैची कळेल ही मात ।
पराहि परतली तेथें कैचा हा हेत ।
जन्ममरणाचा बा पुरलासे अंत ।। जय. ।। २।।

दत्त येऊनियां उभा ठाकला ।
सद्भावे साष्टांगे प्रणिपात केला ।।

प्रसन्न होऊनि आशीर्वाद दिधला ।
जन्ममरणाचा फेरा चुकवीला ।। जय.।।३ ।।

दत्त दत्त ऐसे लागले ध्यान ।
हरपले मन झाले उन्मन ।
मी–तू–पणाची झाली बोळवण ।
एका जनार्दनी श्रीदत्तध्यान ।।४ ।।
जय देव जय देव  जय.।।



# आरती अक्कलकोटच्या श्रीस्वामी समर्थांची

जय जय सद्‌गुरू श्री स्वामी समर्था
आरती करू गुरूवर्या रे।।
अगाध महिमा तव चरणांचा
वर्णाया मती दे हारे ।।धृ ।।

अक्कलकोटी वास करूनिया
दाविली अघटीतचर्या रे।।
लिलापाशे बद्ध करुनिया
तोडीयले भव भया रे ।। १ ।।

यवने पुशिले स्वामी कहां है
अक्कलकोटी पहा रे
समाधी सुखते भोगुनी बोले
धन्य स्वामी वर्या रे ।। २ ।।

जाणसि मनिचे सर्व समर्था
विनवू किती भव भया रे
इतुके देई दिन दयाळा
नच तवपद अंतरा रे ।। ३ ।।



# अच्युतम केशवं

अच्युतम केशवं कृष्ण दामोदरं,
राम नारायणं जानकी वल्लभं

कौन कहता है भगवान आते नहीं,
तुम मीरा के जैसे बुलाते नहीं
अच्युतम केशवं कृष्ण दामोदरं,
राम नारायणं जानकी वल्लभं

कौन कहता है भगवान खाते नहीं,
बेर शबरी के जैसे खिलाते नहीं
अच्युतम केशवं कृष्ण दामोदरं,
राम नारायणं जानकी वल्लभं

कौन कहता है भगवान सोते नहीं,
माँ यशोदा के जैसे सुलाते नहीं
अच्युतम केशवं कृष्ण दामोदरं,
राम नारायणं जानकी वल्लभं

कौन कहता है भगवान नाचते नहीं,
गोपियों की तरह तुम नचाते नहीं

अच्युतम केशवं कृष्ण दामोदरं,
राम नारायणं जानकी वल्लभं

अच्युतम केशवं कृष्ण दामोदरं,
राम नारायणं जानकी वल्लभं



# पसायदान



आता विश्वात्मकें देवें । येणे वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनिं मज ज्ञावे । पसायदान हें

जें खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी– रती वाढो ।
भूतां परस्परे पडो । मैत्र जीवाचें

दुरितांचे तिमिर जावो । विश्व स्वधर्म सूर्यें पाहो ।
जो जे वांच्छिल तो तें लाहो । प्राणिजात

वर्षत सकळ मंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूमंडळी । भेटतु भूतां

चलां कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणींचें गाव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे

चंद्र्मे जे अलांछ्न । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु
किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिन्हीं लोकी ।
भजिजो आदिपुरुखी । अखंडित

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्ट विजयें । होआवे जी ।

येथ म्हणे श्री विश्वेशराओ । हा होईल दान पसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला



# ।। प्रार्थना ।।

सद्गुरुनाथा हात जोडितो अंत नको पाहू।
उकलूनि मनीचे हितगुज सारे वद कवणा दावू।।

निशीदिनी श्रमसी मम हितार्थ तू किती तुज शिण देऊ।
हृदयी वससी परिनच दिससी कैसे तुज पाहू।
सद्गुरुनाथा हात जोडितो अंत नको पाहू।
उकलूनि मनीचे हितगुज सारे वद कवणा दावू।।१।।

उत्तिर्ण नव्हे तव उपकारा जरी तनु तुज वाहू।
बोधुनी दाविसी इहपर नश्वर मनि उठला बाऊ।
सद्गुरुनाथा हात जोडितो अंत नको पाहू।
उकलूनि मनीचे हितगुज सारे वद कवणा दावू।।२।।

कोण कुठिल मी कवण कार्य मम जनि कैसा राहू।
करि मम ऐसा निर्भय निश्चल सम सकला पाहू।

सद्गुरुनाथा हात जोडितो अंत नको पाहू।
उकलूनि मनीचे हितगुज सारे वद कवणा दावू।।३।।

अजाण हतबल भ्रमित मनीची तळमळ कशी साहू।
निरसूनी माया दावि अनुभव प्रचिती नको पाहू।
निरसूनी माया देई दर्शन उशिर नको लावू।
सद्गुरुनाथा हात जोडितो अंत नको पाहू।
उकलूनि मनीचे हितगुज सारे वद कवणा दावू।।४।।



# ।। अपराध क्षमा ।।

अपराध क्षमा आता केला पाहिजे ।
स्वामी हो केला पाहिजे ।
अबद्ध सुबद्ध गुण वर्णियले तुझे ।।धृ.।।

न कळेची टाळ वीणा वाजला कैसा ।
अस्ताव्यस्त पडे नाद झाला भलतैसा ।।१।।

नाही ताल ज्ञान नाही कंठ सुस्वर ।
बरा नाही झाला वाचे वर्ण उच्चार ।।२।।

निरंजन म्हणे देवा वेडे वाकुडे ।
गुणदोष न लावावा सेवकांकडे ।।३।।



# प्रार्थना

घालीन लोटांगण वंदीन चरण । डोळ्यानि पाहीन रूप तुझे ।
प्रेमे आलिंगन आनंदे पूजिन । भावे ओंवाळिन म्हणे नामा ।।१।।

त्वमेव माता च पिता त्वमेव । त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देव देव ।।२।।

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा । बुद्ध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात् ।
करोनि यद्यत् सकलं परस्मै । नारायणायेति समर्पयामि ।।३।।

अच्युतं केशवं रामनारायणं । कृष्णं दामोदरं वासुदेवं हरिम् ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं । जानकीनायकं रामचंद्रं भजे ।।४।।

हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।५।।



# ।। मंत्रपुष्पांञ्जली ।।

ॐ यज्ञेन यज्ञमयजंत देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।
ते ह नाकं महिमानः सचंते यत्र पूर्वे साध्याः संति देवाः ।
ॐ राजाधिराजाय प्रसह्यसाहिने नमो वयं वैश्रवणाय कुर्महे।
स मे कामान् कामकामाय कह्यं ।
कामेश्वरो वैश्रवणो ददातु ।
कुबेराय वैश्रवणाय महाराजाय नमः ।
ॐ स्वस्ति । साम्राज्यं भौज्यं, स्वाराज्यं, वैराज्यं, पारमेष्ठयं, राज्यं महाराज्यमाधिपत्यमयं । समंत पर्यायीस्यात् सार्वभौमः सर्वायुष आंतादापरार्धात् ।। पृथिवै समुद्रपर्यंताया एकराळिति। तदप्येषश्लोकोऽभिगीतो मरूतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन् गृहे । आविक्षितिस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति ।।

मंत्रपुष्पं समर्पयामि ।

(हातातील फुले व अक्षता देवीला अर्पण कराव्यात.)



# द्रौपदीची अक्षय्य थाळी
# अन्नदान

पवित्र अन्नदान करा...

आणि दिव्य अनुभवांची प्रचिती घ्या...

वेबसाईटला भेट द्या : www.draupadithali.org

अन्नदानासाठी रोख रक्कम किंवा धान्यस्वरूपामध्ये देणगी देऊ शकता. ऑनलाईन सेवा ही उपलब्ध

---

बँकेचे नाव : स्टेट बँक ऑफ इंडिया, डेक्कम जिमखाना शाखा, पुणे

खात्याचे नाव – कर्दळीवन सेवा संघ ट्रस्ट

चालू खाते क्र. : ३४८०९०७७०६४ IFS Code : SBIN0001110

---

अधिक माहितीसाठी कर्दळीवन सेवा संघाशी संपर्क साधा.



# गोदानाची.. गोसेवेची.. अद्भुत अनुभूती

गोसेवा करा... गोदान करा...

गाईला चारा द्या...

पंचगव्य औषधे वापरा.. रोज अग्निहोत्र करा..

---

**सर्व प्रकारच्या आजारांपासून संरक्षण मिळविण्यासाठी**

---

१. रोज गाईच्या शेणीमध्ये धूप+कापूर घालून धूर करा. सर्व प्रकारच्या प्रदूषणापासून मुक्तता अनुभवा १००% **Air Purifier**

२. आंघोळीच्या पाण्यामध्ये रोज गोमूत्र अर्काचे ५–६ थेंब टाका.

३. पिण्याच्या पाण्यात गोमूत्र अर्काचे ३–४ थेंब घाला.

४. रोज सकाळी अनुशापोटी १० मि.ली. गोमूत्र अर्काचे सेवन करा.

५. फरशी पुसायला गोमूत्रापासून तयार केलेले सुगंधी फिनेल वापरा.

## गोशाळेला प्रत्यक्ष भेट द्या....!

गोशाळा पुण्यापासून ३० किमी अंतरावर लवासा रोडवर आहे.

**संपर्क : श्री. कुबेर पोपटी काका – मो. ९७३००८९३६३**

वेबसाईटला भेट द्या : **www.gosevapariwar.org**



7057617018 या क्रमांकावर Join KSS असा मेसेज पाठवून कर्दळीवन सेवा संघाच्या व्हॉटस् ॲप ग्रुपला जॉईन व्हा...

# कर्दळीवन परिक्रमा

श्रीदत्तात्रेयांचे गुप्त स्थान
श्रीस्वामीसमर्थांचे प्रकटस्थान.

# श्रीदत्त परिक्रमा

श्रीदत्त संप्रदायातील सर्व परंपरांना
एकत्र गुंफणारी अनोखी परिक्रमा.

# स्वर्गारोहिणी परिक्रमा

जिथून पांडव स्वर्गाकडे गेले...
हिमालयातील सर्वोच्च दैवी अनुभूती...


## कर्दळीवन सेवा संघ

६२२, जानकी रघूनाथ, पुलाचीवाडी, झेड ब्रिज जवळ, डेक्कन जिमखाना, पुणे ४
दूरध्वनी : 020-25534601/25530371 मोबाईल : 9605770967
ईमेल : swami@kardaliwan.com वेबसाईट : www.kardaliwan.com

